महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१६/प्र.क्र.२४५/२०१६/आस्था-३

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
तारीख : ०३ जानेवारी, २०१७.

**शासन आदेश-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील श्रीमती एन.बी. घाणेकर, निवडश्रेणी उप मुख्य कार्यकारी अधिकारी संवर्ग (सध्या नियुक्तीशिवाय) यांची या आदेशान्वये उप जिल्हा कार्यक्रम समन्वयक (मग्रारोहयो), जि.पालघर या रिक्त पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

२. श्रीमती एन.बी. घाणेकर यांनी त्यांच्या सदर पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, त्या शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्रीमती एन.बी. घाणेकर यांनी नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०३१२१२०५७७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Dattatraya Shinde

Digitally signed by Vijay Dattatraya Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabf0ce38fdf553beb949764920592a97832b6399cb7060200d032e127e455f1, cn=Vijay Dattatraya Shinde
Date: 2017.01.03 12:51:35 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
३) मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
४) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर.
६) महालेखापाल-१ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
८) श्रीमती एन.बी. घाणेकर, ४०३, बिल्डिंग नं.१, हरसिध्द पार्क, पवार नगर, ठाणे- ४०० ६१०.
९) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१०) निवड नस्ती (आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.